गृहनिर्माण विभागाच्या अखत्यारीतील म्हाडा प्राधिकरण तसेच म्हाडा अधिनस्त विविध मंडळामधील पदे प्रतिनियुक्तीने भरण्याबाबतची कार्यपद्धती......

**महाराष्ट्र शासन**

**गृहनिर्माण विभाग,**

**शासन निर्णय क्रमांक : प्रतिनि-२०२०/प्र.क्र. २२/गृनिभू**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.

दिनांक : २० फेब्रुवारी, २०२०

संदर्भ : **१. सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय, क्र. एसआरव्ही -२०११/ प्र.क्र.१३७/ कार्यासन १२, दि.१७.१२.२०१६.**
**२. सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय, क्र. एसआरव्ही- २०१६/ प्र.क्र.५१०/कार्या.१२, दि.१६.०२.२०१८.**
**३. गृहनिर्माण विभाग, शासन परिपत्रक क्र. नियुक्ती २०१९/प्र.क्र.६९ (२) /गृनिभू, दि.१७.०७.२०१९.**

**प्रस्तावना :-**

राज्य शासनाच्या विविध विभाग /विभागाच्या अधिपत्याखालील मंडळे/ महामंडळातील पदांवर सबधित प्रशासकीय विभागाकडून प्रतिनियुक्तीने करावयाच्या नियुक्तीसाठी अटी व शर्ती आणि नियुक्तीची कार्यपद्धती याबाबतचे सर्वसमावेशक धोरण शासनाच्या संदर्भ क्र. १ व २ येथील शासन निर्णयान्वये निश्चित करण्यात आले आहे. संदर्भ क्र. १ येथील शासन निर्णयाच्या क्र. ६ अन्वये विहीत केलेल्या कार्यपद्धतीनुसार, ज्या कार्यालयास अन्य विभागातील/कार्यालयातील अधिकारी/ कर्मचारी प्रतिनियुक्तीने हवे असतील, त्या विभागाने/कार्यालयाने विहीत पद्धती अनुसरुन प्रतिनियुक्तीने पदे भरावयाची आहेत.

२. गृहनिर्माण विभागाच्या अधिनस्त असलेल्या म्हाडा प्राधिकरण कार्यालयातील व म्हाडाच्या विविध मंडळातील काही पदे प्रतिनियुक्तीने भरण्यात येतात. सदर पदांच्या सेवाप्रवेश नियमानुसार/ सेवा शर्तीनुसार ही पदे सामान्य प्रशासन, महसुल, वित्त, सहकार, ग्राम विकास इत्यादि विभागांच्या अखत्यारीतील संवर्गातील पदांमधून भरण्यात येतात.सदर पदे गृहनिर्माण विभागाच्या अधिनस्त कार्यालयातील असली तरी, त्या पदांवर वर नमूद विविध प्रशासकीय विभागांक्डून परस्पर नियुक्त्या करण्यात येतात. यास्तव, म्हाडा प्राधिकरण तसेच अधिनस्त मंडळामध्ये अन्य विभाग/कार्यालयातून प्रतिनियुक्तीने करण्यात येणा-या नियुक्त्या गृहनिर्माण विभागाच्या मान्यतेशिवाय करण्यात येऊ नयेत तसेच गृहनिर्माण विभागाच्या मान्यतेशिवाय प्रतिनियुक्तीने नियुक्ती केलेल्या अधिकारी/कर्मचारी यांना म्हाडाच्या पदावर रुजु करुन घेऊ नये असे निर्देश शासनाच्या संदर्भ क्र. ३ येथील परिपत्रकान्वये देण्यात आलेले आहेत. तथापि,

शासनाच्या प्रतिनियुक्ती धोरणातील तरतूदी तसेच या विभागाच्या सुचनांचे वारंवार उल्लंघन करून म्हाडा प्राधिकरण तसेच म्हाडा अधिनस्त मंडळातील पदांवर परस्पर नियुक्त्या देण्यात येत असल्याचे निदर्शनास येत आहे. म्हाडा प्राधिकरण व अधिनस्त मंडळातील प्रतिनियुक्तीने भरण्यात येणारी पदे महत्वपुर्ण पदे असून त्या पदांवर नियुक्त्या करताना शासनाने निश्चित केलेल्या कार्यपद्धतीचे काटेकोरपणे पालन होणे आवश्यक आहे. या सर्व बाबी विचारात घेऊन, म्हाडा प्राधिकरण व म्हाडा अधिनस्त विविध मंडळातील / कार्यालयातील प्रतिनियुक्तीने पदस्थापना करण्याबाबतची कार्यपद्धती निश्चित करण्याचे शासनाच्या विचाराधीन होते. त्यानुसार गृहनिर्माण विभागाचे संदर्भाधिन दि.१७.०७.२०१९ रोजीचे शासन परिपत्रक याद्वारे अधिक्रमित करुन खालीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे :-

**<u>शासन निर्णय</u> :-**

१. राज्य शासनाच्या विविध विभाग /विभागाच्या अधिपत्याखालील मंडळे/ महामंडळातील पदांवर संबधित प्रशासकीय विभागाकडून प्रतिनियुक्तीने करावयाच्या नियुक्तीसाठी शासनाच्या शासन निर्णय दि. १७-१२-२०१६ व दि. १६-०२-२०१८ अन्वये सर्वसमावेशक धोरण निश्चित करण्यात आले आहे. त्यास अनुसरुन, गृहनिर्माण विभागाच्या अखत्यारीतील म्हाडा प्राधिकरण कार्यालय तसेच म्हाडाच्या अधिनस्त सर्व मंडळातील विविध संवर्गातील जी पदे प्रतिनियुक्तीने भरण्यात येतात, त्या पदांवर प्रतिनियुक्तीने पदस्थापना करण्याकरीता गृहनिर्माण विभागामार्फत पुढीलप्रमाणे कार्यवाही करण्यात येईल:-

(१) गृहनिर्माण विभागाच्या प्रशासकीय नियंत्रणाखालील, म्हाडा प्राधिकरण कार्यालय तसेच म्हाडा अधिनस्त विविध मंडळातील/कार्यालयातील जी पदे प्रतिनियुक्तीने भरावयाची आहेत, त्या प्रत्येक पदासाठी मंत्रालयीन इन्ट्रानेट वरील संकेतस्थळावर प्रतिनियुक्त्या (Deputation) या लिंकखाली तसेच गृहनिर्माण विभागाच्या संकेतस्थळावर देखील जाहिरात प्रसिद्ध करण्यात येईल.

(२) प्रतिनियुक्तीने नियुक्तीसाठी अर्ज प्राप्त होणा-या इच्छुक अधिकारी/कर्मचारी यांच्या संबंधित विभागाकडून अलीकडच्या ५ वर्षाचे गोपनिय अहवाल (साक्षांकित प्रती), संबंधित अधिकारी/कर्मचारी यांचेविरुद्ध भ्रष्टाचार/लाचलुचपत गुन्ह्यासंदर्भातील प्रकरणे, फौजदारी प्रकरण, महाराष्ट्र नागरी सेवा (शिस्त व अपिल) नियम, १९७९ अंतर्गत नियम ८ खाली विभागीय चौकशी सुरु आहे अथवा शिक्षेची अंमलबजावणी चालु आहे किंवा कसे तसेच मागील १० वर्षात झालेल्या शिक्षेचा तपशील याबाबतची इत्यंभूत माहिती व ना-हरकत प्रमाणपत्र मागविण्यात येईल. सदरची माहिती संबंधित विभागाने १० कार्यालयीन दिवसात या विभागास पाठविणे बंधनकारक राहील.

(३) गृहनिर्माण विभागाच्या अखत्यारीतील म्हाडा प्राधिकरण कार्यालय तसेच म्हाडा अधिनस्त विविध मंडळातील/ कार्यालयातील गट-अ व गट-ब (राजपत्रित) या संवर्गातील पदावर प्रतिनियुक्तीने निवड करण्याकरीता पुढीलप्रमाणे त्रि-सदस्यीय समिती गठीत करण्यात येत आहे :-

| अ.क्र. | सदस्य | पद |
|---|---|---|
| १ | अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव / सचिव (गृहनिर्माण) | अध्यक्ष |
| २ | सह सचिव/उप सचिव (गृनिभू) | सदस्य |
| ३ | अवर सचिव (गृनिभू) | सदस्य सचिव |

(४) त्याचबरोबर गृहनिर्माण विभागाच्या अखत्यारीतील म्हाडा प्राधिकरण कार्यालय तसेच म्हाडा अधिनस्त विविध मंडळातील/ कार्यालयातील गट-ब (अराजपत्रित), गट-क व गट-ड या संवर्गातील पदावर प्रतिनियुक्तीने निवड करण्याकरीता पुढीलप्रमाणे त्रि-सदस्यीय समिती गठीत करण्यात येत आहे :-

| अ.क्र. | सदस्य | पद |
|---|---|---|
| १ | उपाध्यक्ष तथा मुख्य कार्यकारी अधिकारी, म्हाडा | अध्यक्ष |
| २ | म्हाडा प्राधिकरण कार्यालयातील मुख्य अभियंता / संबधित मंडळाचे मुख्य अधिकारी | सदस्य |
| ३ | म्हाडा प्राधिकरणाचे सचिव | सदस्य सचिव |

(५) उपरोक्त समिती म्हाडा प्राधिकरण कार्यालय तसेच म्हाडा अधिनस्त विविध मंडळातील/ कार्यालयातील पदे प्रतिनियुक्तीने भरण्यासाठी प्राप्त झालेल्या अर्जांची छाननी करुन उमेदवारांच्या गुणवत्तेनुसार पसंतीक्रमाची यादी तयार करुन खालील तक्त्यात नमुद सक्षम प्राधिका-यांकडे यादी सादर करेल. सदर सक्षम प्राधिकारी त्यामधून एका पदासाठी एक याप्रमाणे उमेदवारांची निवड करतील :-

| अ.क्र. | पदे | सक्षम प्राधिकारी |
|---|---|---|
| १ | ज्या पदाची वेतनश्रेणी सहाव्या वेतन आयोगानुसार पे बँड रु.१५६००-३९१०० + ग्रेड पे रु.६६०० अशी आहे, त्या किंवा त्यापेक्षा वरिष्ठ वेतनश्रेणीत वेतन घेणारे गट-अ मधील पदे. | मा. मुख्यमंत्री |

| | | |
|---|---|---|
| २ | गट-अ (सहाव्या वेतन आयोगानुसार पे बँड रु.१५६००-३९१०० + ग्रेड पे रु.६६०० व त्यापेक्षा वरिष्ठ वेतनश्रेणीतील पदे वगळून) आणि गट-ब (राजपत्रित) पदे. | मा. मंत्री, गृहनिर्माण |
| ३ | गट-ब (अराजपत्रित), गट-क आणि गट-ड मधील पदे. | अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/ सचिव, गृहनिर्माण |

२. गृहनिर्माण विभागाच्या अखत्यारितील म्हाडा प्राधिकरण कार्यालय तसेच म्हाडा अधिनस्त विविध मंडळातील/ कार्यालयातील कोणत्याही पदावर अन्य विभागाकडून परस्पर पदस्थापना करण्यात येऊ नये. जर अशाप्रकारची परस्पर पदस्थापना केल्यास, संबंधित अधिकारी/कर्मचारी यांना सदर पदावर रुजू करुन घेण्यात येणार नाही. त्याचबरोबर सदर पदावरील अधिकारी/कर्मचारी यांचा प्रतिनियुक्तीचा कालावधी संपुष्टात आल्यानंतर किंवा तत्पुर्वी म्हाडा प्राधिकरण तसेच क्षेत्रीय कार्यालयाने त्यांना परस्पर कार्यमुक्त करु नये.

३. गृहनिर्माण विभागाच्या अधिपत्याखालील म्हाडा प्राधिकरण कार्यालय तसेच म्हाडा अधिनस्त विविध मंडळातील/ कार्यालयातील पदावर प्रतिनियुक्तीने कार्यरत असलेल्या अधिकारी/कर्मचारी यांना प्रतिनियुक्तीच्या कालावधीत निलंबिनाची कार्यवाही करावयाची असल्यास अशी कार्यवाही गृहनिर्माण विभागाकडून करण्यात येईल. त्याचबरोबर विभागीय चौकशीची कार्यवाही करावयाची असल्यास अशी कार्यवाहीसुद्धा गृहनिर्माण विभागामार्फत करण्यात येऊन अंतिम शिक्षा संबंधित दोषी अधिका-यांवर बजावण्याची कार्यवाही अधिकारी/कर्मचारी यांच्या मुळ नियुक्ती प्राधिका-याकडून करण्यात येईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in. या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२००२२०११२९२०१४०९ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

Manohar Ramchandra Parkar

Digitally signed by Manohar Ramchandra Parkar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Housing Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c4c0810e9c94cf92d42a36d93c8f7b6ac18542c1ee758c9cfd dcea906d9cf544, serialNumber=fb43688343316856c0f7e793462127aa87fce45724e87 929c6889798cd7d2c62, cn=Manohar Ramchandra Parkar
Date: 2020.02.20 15:02:40 +05'30'

**( म.रा. पारकर )**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई.

२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. विरोधी पक्षनेता (विधानसभा / विधानपरिषद), विधानमंडळ सचिवालय, मुंबई
४. महाराष्ट्र विधानमंडळाचे सर्व सन्माननीय विधानसभा / विधानपरिषद सदस्य
५. मा. मुख्य सचिव यांचे खाजगी सचिव
६. अपर मुख्य सचिव, गृहनिर्माण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
७. सर्व प्रशासकीय विभागांचे अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/ सचिव
८. मा. मंत्री, गृहनिर्माण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२
९. मा. राज्यमंत्री, गृहनिर्माण यांचे खाजगी सचिव,मंत्रालय, मुंबई-३२
१०. उपाध्यक्ष तथा मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण, वांद्रे (पुर्व), मुंबई-५१
११. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर
१२. सर्व उप सचिव, गृहनिर्माण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१३. मुख्य अधिकारी, मुंबई गृहनिर्माण व क्षेत्रविकास मंडळ, मुंबई
१४. मुख्य अधिकारी, मुंबई इमारत दुरुस्ती व पुनर्रचना मंडळ, मुंबई
१५. मुख्य अधिकारी, मुंबई झोपडपट्टी सुधार मंडळ, मुंबई
१६. मुख्य अधिकारी, कोकण गृहनिर्माण व क्षेत्रविकास मंडळ, मुंबई
१७. मुख्य अधिकारी, नाशिक गृहनिर्माण व क्षेत्रविकास मंडळ, नाशिक
१८. मुख्य अधिकारी, अमरावती गृहनिर्माण व क्षेत्रविकास मंडळ, अमरावती
१९. मुख्य अधिकारी, औरंगाबाद गृहनिर्माण व क्षेत्रविकास मंडळ, औरंगाबाद
२०. मुख्य अधिकारी, नागपूर गृहनिर्माण व क्षेत्रविकास मंडळ, नागपूर
२१. मुख्य अधिकारी, पुणे गृहनिर्माण व क्षेत्रविकास मंडळ, पुणे
२२. सर्व अवर सचिव/कक्ष अधिकारी, गृहनिर्माण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
२३. निवड नस्ती (गृनिभू)